अग्निशमन आपत्कालिन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान योजनेंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
बोधवड नगरपंचायत, जि.जळगांव

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अशसे-२०२५/प्र.क्र.१७ (१३)/नवि-०४ (ई-१०४२०१६)**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक: - ०६ मे,२०२५.**

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशास-४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दिनांक ३१ ऑगस्ट,२००९.
२) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२७/नवि-२०, दिनांक १२ ऑगस्ट,२०१६.
३) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशसे-२०१९/प्र.क्र.६१/नवि-०४, दिनांक १२ मार्च,२०२१.
४) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशसे-२०२३/प्र.क्र.८९/नवि-०४, दिनांक ०१ डिसेंबर,२०२३.
५) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशसे-२०२३/ प्र.क्र.८९/ नवि-०४, दिनांक २४ जुलै, २०२४.
६) महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.मअसे-२०२४/३२/११६१, दि.१९ जुलै, २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरून काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने दि.३१.०८.२००९ रोजी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नव्याने स्थापन झालेल्या ड-वर्ग महानगरपालिका,नगरपरिषदा व नगरपंचायती यांचा समावेश महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानात करण्यात आला आहे. संदर्भ क्र.१ येथील दिनांक ३१.०८.२००९ च्या शासन निर्णयानुसार अग्नीशमन केंद्राच्या प्रकारानुसार अग्नीशमन केंद्र बांधकामासाठी अनुज्ञेय खर्च व अनुज्ञेय खर्चाच्या मर्यादा निश्चित करण्यात आल्या होत्या. संदर्भ क्र.३ व ४ येथील शासन निर्णयान्वये सदर अनुज्ञेय खर्चाच्या मर्यादेत व वित्तीय आकृतीबंधात सुधारणा करुन महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत अग्नीशमन केंद्र बांधकाम व अग्नीशमन वाहन खरेदीसाठी अनुज्ञेय खर्च मर्यादा नव्याने निश्चित करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. ५ अन्वये अभियानांतर्गत अग्निशमन वाहानांची खरेदी व बांधणी नागरी स्थानिक स्वराज्य संस्था ऐवजी संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांच्या स्तरावर करण्यास मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र. (६) अन्वये संचालक,महाराष्ट्र अग्निशमन सेवा

संचालनालय, यांनी बोधवड नगरपंचायत, जि.जळगांव यांचा महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांनी संदर्भ क्र.६ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत **बोधवड नगरपंचायत, जि.जळगांव** यांचा महाराष्ट्र अग्निसुरक्षांतर्गत समावेश करून, त्यांना **१ अग्निशमन केंद्र बांधण्यास व १ अग्निशमन वाहन** खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियांनातर्गत मुख्याधिकारी, बोधवड नगरपंचायत, जि.जळगांव यांनी अग्निशमन केंद्राच्या बांधकामाचे अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाची तांत्रिक मान्यता घेऊन प्रस्ताव सादर केले आहे.

**०३. १ अग्निशमन केंद्राच्या इमारतीचे बांधकामाकरीता व १ अग्निशमन वाहनाकरीता रु.१,९०,००,०००/- (रूपये एक कोटी नव्वद लक्ष मात्र)** इतक्या रक्कमेस पुढील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | बाब | संख्या | शासन हिस्सा | नगरपालिका हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | अग्निशमन केंद्र | १ | ९०,००,००० | १०,००,००० | १,००,००,००० |
| २ | अग्निशमन वाहन | १ | ८१,००,००० | ९,००,००० | ९०,००,००० |
| एकूण | | | १,७१,००,००० | १९,००,००० | १,९०,००,००० |

**अ)** सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना शासन निर्णय ,सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.बीडीजी २०१४/प्र.क्र.९६/इमा.३, दि.८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**ब)** काम सुरू करण्यापूर्वी अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग व प्रशासकीय विभागाने सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करून घ्यावे.

**क)** काम सूरू करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सूरू करावे.

**ड)** ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक/दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

**इ)** प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानूसार कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** नगरपरिषद हिश्श्याची (१०%) रु.१९,००,०००/- रक्कम नगरपरिषदेने अदा करणे बंधनकारक राहील. सदर केंद्र बांधणी व वाहन खरेदी करताना अतिरिक्त निधीची आवश्यकता भासल्यास सदर खर्च नगरपरिषद स्वनिधीतून खर्च करु शकेल. वाढीव खर्चासाठी शासन स्तरावरुन कोणतेही वाढीव अनुदान मंजुर करण्यात येणार नाही.

**०५.** यान्वारे मान्यता देण्यात येत असलेल्या अग्निशमन केंद्र व अग्निशमन वाहनाबाबत संदर्भ क्र. ५ अन्वये निश्चित केलेल्या कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

**०६.** सदर कामासाठी येणारा खर्च "एफ-२, २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००)(५३) राज्यातील नगरपरिषदांना अग्निशमन सेवा व आणीबाणीच्या सेवांच्या बळकटीकरणासाठी सहाय (२२१७ ३२१५) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या अनुदानमधून भागविण्यात यावा.

**०७.** सदर प्रशासकीय मान्यता संदर्भ क्र.१ ते ५ येथील शासन निर्णयातील नमूद अटी व शर्तीनुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५०६१३२८३१४५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA PARBAT DALVI

Digitally signed by MAHENDRA PARBAT DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e687fdecf6e6c3d1891a03c3515e1681bedf82a21ad79ad6d0b6f7a911a1d3fc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8077AF9533C0322E769EE4FAB8AD782BC365A071F23E8951D686CCFEC4ED1244, cn=MAHENDRA PARBAT DALVI
Date: 2025.05.06 13:29:11 +05'30'

**( महेंद्र दळवी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (नगर विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव -नवि-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव-नवि-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१३) संचालक, महाराष्ट्र अग्निमशन सेवा संचालनालय, मुंबई,
१४) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई.
१५) मुख्याधिकारी, बोधवड नगरपंचायत, जि.जळगांव.
१६) कक्ष अधिकारी (व्यय-३) / (अर्थसंकल्प-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती, (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.